**कोषागारातून रोख देय अनुदान**
**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत..... (२२१५९७९१)**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** राग्रापे-२०१५/प्र.क्र.३३/पा.पु.१०
जी.टी.हॉस्पीटल इमारत, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: २३ जुलै, २०१५

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदानांतर्गत आर्थिक वर्ष २०१५-१६ मध्ये मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९७९१) या लेखाशिर्षाखाली संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना कव्हरेज व गुणवत्ताबाधित क्षेत्रासाठी तसेच देखभाल व दुरुस्ती अंतर्गत सर्वसाधारण घटकांतर्गत ( Normal allocation) पाणी पुरवठा योजना राबविण्यासाठी अनुदान मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

यासंदर्भात उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत रु. १२७.४५९ कोटी एवढे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत विविध जिल्हा परिषदांना मंजूर व मुक्त करण्यात येत आहे. सदर एकूण रु. १२७.४५९ कोटी (रुपये एकशे सत्तावीस कोटी, पंचेचाळीस लाख व नव्वद हजार मात्र ) एवढया अनुदानापैकी रु. १०८.३४ कोटी ( रुपये एकशे आठ कोटी व चौतीस लाख मात्र ) एवढे अनुदान कव्हरेज व गुणवत्ताबाधीत क्षेत्रातील ग्रामीण भागातील नळ पाणी पुरवठा योजना राबविण्यासाठी व उर्वरित रु. १९.११९० कोटी ( रुपये एकोणीस कोटी, अकरा लाख व नव्वद हजार मात्र ) एवढे अनुदान ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल व दुरुस्तीसाठी या शासन निर्णया सोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे संबंधित जिल्हा परिषदांना मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**अटी :-**

१) संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी हे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निश्चित वार्षिक कृती आराखडयात उपरोक्त घटकांसाठी समाविष्ट असलेल्या शाश्वतता व कव्हरेज व गुणवत्ताबाधीत गावे/वाडयांमधील प्राथम्यक्रमानुसार येणाऱ्या गावे/वाडयांमधील योजनांची कामे तसेच ज्या केंद्रीय सहाय्यित योजनांमध्ये शासन सहभाग सक्तीचा करण्यात आलेला आहे, अशा प्रगतीपथावरील योजनांची कामे पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करावयाचे आहे.

२) संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील अटी व शर्तीची व NRDWP या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १ /२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परिक्षणाकरीता संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

३) शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. आरसीएन-१८९/सी.आर.-३०२७/२८, दि. ५/९/९० मधील सूचनेप्रमाणे सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी विभागीय आयुक्त, (विकास शाखा) यांना व कार्यासन पापु-१० /पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

४) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कव्हरेज व गुणवत्ताबाधीत याखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च हा ५०% केंद्र निधीतून व ५०% राज्य निधीतून करणे आवश्यक आहे.

५) केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता, IMIS या प्रणालीवर घेण्यात येऊन सदर नोंदी वेळोवेळी अद्ययावत करण्यात याव्यात.

६) सदर निधी सन २०११-१२, २०१२-१३, २०१३-१४, व २०१४-१५ या वर्षांच्या कृती आराखडयात समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा. तसेच उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी उपयोगात आणण्यासाठी कालबध्द कार्यक्रम आखून खर्चाचे नियोजन करावे व उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास वेळीच सादर करावीत.

७) सदर रक्कम त्वरित आहरीत करण्यात यावी.

यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९७९१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१५-१६ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक दि. १७/०४/२०१५ व दि. ३०/०६/२०१५ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०१५०३३११२१७३४८८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Dattatray Salve

Digitally signed by Ashok Dattatray Salve
DN: CN = Ashok Dattatray Salve, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.07.24 14:17:32 +05'30'

( अ.द.साळवे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

महालेखापाल, महाराष्ट्र- १ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
नियोजन विभाग, (कार्यासन-१४४३) / वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त,

मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा
मुख्य लेखा व वित्त अधिकारी सर्व जिल्हा परिषदा
संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई, बेलापूर
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, सर्व जिल्हा परिषदा
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पा.पु.०४, पा.पु.२०.
निवडनस्ती पापु-१० कार्यासन.

## विवरणपत्र

शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. राग्रापे २०१५/प्र.क्र.३३/पापु-१०, दिनांक : २३ जुलै, २०१५ चे सहपत्र

ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांसाठी निधी वितरण (केंद्र हिस्सा) **(सर्वसाधारण घटक)**
**(लेखाशिर्ष २२१५ ९७९१)**

(रुपये लाखात)

| अ.क्र. | अंमलबजावणी यंत्रणेचे नांव | वितरीत करण्यात येणारी रक्कम | | एकूण वितरीत रक्कम |
|---|---|---|---|---|
| | | कव्हरेज व गुणवत्ताबाधीत क्षेत्र | देखभाल व दुरुस्ती | |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | जिल्हा परिषद, ठाणे | २५०.०० | ५२.०० | ३०२.०० |
| २ | जिल्हा परिषद, रायगड | ६३४.०० | ६८.०० | ७०२.०० |
| ३ | जिल्हा परिषद, रत्नागिरी | - | ५०.०० | ५०.०० |
| ४ | जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग | ३००.०० | २४.०० | ३२४.०० |
| ५ | जिल्हा परिषद, पालघर | २५०.०० | २०.०० | २७०.०० |
| ६ | जिल्हा परिषद, पुणे | - | ८५.०० | ८५.०० |
| ७ | जिल्हा परिषद, सातारा | ४५०.०० | ३३.०० | ४८३.०० |
| ८ | जिल्हा परिषद, सांगली | ४५०.०० | ८०.०० | ५३०.०० |
| ९ | जिल्हा परिषद, कोल्हापूर | १५००.०० | ६३.०० | १५६३.०० |
| १० | जिल्हा परिषद, सोलापूर | ६००.०० | १०८.९० | ७०८.९० |
| ११ | जिल्हा परिषद, नाशिक | ७००.०० | ८३.०० | ७८३.०० |
| १२ | जिल्हा परिषद, धुळे | - | ३७.०० | ३७.०० |
| १३ | जिल्हा परिषद, नंदूरबार | - | २२.०० | २२.०० |
| १४ | जिल्हा परिषद, जळगांव | ८००.०० | ८३.०० | ८८३.०० |

Ashok Dattatray Salve

Digitally signed by Ashok Dattatray Salve
DN: CN = Ashok Dattatray Salve, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.07.24 14:18:12 +05'30'

**(अ.द.साळवे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १५ | जिल्हा परिषद, अहमदनगर | ६५०.०० | ९८.०० | ७४८.०० |
| १६ | जिल्हा परिषद, औरंगाबाद | - | ७१.०० | ७१.०० |
| १७ | जिल्हा परिषद,जालना | ३००.०० | ५८.०० | ३५८.०० |
| १८ | जिल्हा परिषद, परभणी | - | ३३.०० | ३३.०० |
| १९ | जिल्हा परिषद, हिंगोली | - | ३४.०० | ३४.०० |
| २० | जिल्हा परिषद, बीड | - | ५८.०० | ५८.०० |
| २१ | जिल्हा परिषद, उस्मानाबाद | ४००.०० | ५२.०० | ४५२.०० |
| २२ | जिल्हा परिषद, नांदेड | १०००.०० | ६३.०० | १०६३.०० |
| २३ | जिल्हा परिषद, लातूर | ३००.०० | ६०.०० | ३६०.०० |
| २४ | जिल्हा परिषद, अमरावती | - | ९४.०० | ९४.०० |
| २५ | जिल्हा परिषद, अकोला | - | ४७.०० | ४७.०० |
| २६ | जिल्हा परिषद, वाशिम | - | ४४.०० | ४४.०० |
| २७ | जिल्हा परिषद, यवतमाळ | - | ९४.०० | ९४.०० |
| २८ | जिल्हा परिषद, बुलडाणा | ३००.०० | १०३.०० | ४०३.०० |
| २९ | जिल्हा परिषद, नागपूर | - | ५५.०० | ५५.०० |
| ३० | जिल्हा परिषद, वर्धा | ९००.०० | २०.०० | ९२०.०० |
| ३१ | जिल्हा परिषद, भंडारा | ३००.०० | २०.०० | ३२०.०० |
| ३२ | जिल्हा परिषद, गोंदिया | ३५०.०० | २०.०० | ३७०.०० |
| ३३ | जिल्हा परिषद, चंद्रपूर | १००.०० | ५४.०० | १५४.०० |
| ३४ | जिल्हा परिषद, गडचिरोली | ३००.०० | २५.०० | ३२५.०० |
| | **एकूण** | १०८.३४ कोटी | १९.११९० कोटी | **१२७.४५९० कोटी** |
| | | रु. १२७.४५९० (रुपये एकशे सत्तावीस कोटी, पंचेचाळीस लाख व नव्वद हजार मात्र) | | |

Ashok Dattatray Salve

Digitally signed by Ashok Dattatray Salve
DN: CN = Ashok Dattatray Salve, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.07.24 14:18:36 +05'30'

**( अ. द. साळवे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन